**जल जीवन मिशन अंतर्गत राज्य पाणी स्वच्छता मिशन व जिल्हा पाणी व स्वच्छता मिशनवरील पदे (योजना कालावधीकरीता) निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्र. जजीमि-०१२०/प्र.क्र.६५/पापु-०७**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई.
तारीख: ०४ नोव्हेंबर, २०२०

वाचा-

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. जस्वप्र-२०१४/प्र.क्र.३४/पापु-११, दिनांक १७.०२.२०१४.
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. जजीमि-२०२०/प्र.क्र.१३८/पापु-१०(०७), दिनांक ०४.०९.२०२०

प्रस्तावना-

केंद्र शासनाने राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाची पुनर्रचना करुन नवीन जल जीवन मिशनची सुरुवात केली आहे. जल जीवन मिशनच्या केंद्र शासनाच्या दिनांक २५.१२.२०१९ रोजी प्रसिध्द केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यात जल जीवन मिशन राबविण्याकरीता सविस्तर मार्गदर्शक सूचना दिनांक ०४.०९.२०२० च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर शासन निर्णयातील परिशिष्ट क्र. १ मध्ये नमुद राज्य पाणी व स्वच्छता मिशनकरीता १३ पदे तर परिशिष्ट क्र. २ मध्ये नमुद जिल्हा पाणी व स्वच्छता मिशनकरीता १३६ पदे नव्याने निर्माण करण्याच्या प्रस्तावास मा. मंत्रीमंडळाच्या दिनांक ०८ जुलै, २०२० रोजीच्या बैठकीमध्ये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार याबाबतचा प्रस्ताव अपर मुख्य सचिव (सेवा) यांच्या अध्यक्षतेखालील उपसमिती व मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेस सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास उपरोक्त दोन्ही समितींची मान्यता प्राप्त झाली आहे. प्राप्त मान्यतेस अनुसरून जल जीवन मिशन योजना कालावधीकरीता राज्य पाणी व स्वच्छता मिशनसाठी १३ व जिल्हा पाणी व स्वच्छता मिशनसाठी १३६ पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

राज्यात जल जीवन मिशनच्या अंमलबजावणीकरीता राज्य पाणी व स्वच्छता मिशनसाठी पुढील १३ पदे दिनांक ०१.१०.२०२० पासून मिशन कालावधीपर्यंत नव्याने निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**जल जीवन मिशन अंतर्गत राज्य पाणी व स्वच्छता मिशनकरीता नव्याने निर्माण करण्यात आलेली पदे**

| अ.क्र. | नव्याने निर्मित पदाचे नाव | पद संख्या | भरतीचा स्वरुप | भरतीचा संवर्ग |
|---|---|---|---|---|
| **१.** | **२.** | **३.** | **४.** | **५.** |
| १. | मिशन संचालक, भा.प्र.से. | १ | प्रतिनियुक्ती | भा.प्र.से. मधील सचिव दर्जा |
| २. | प्रकल्प व्यवस्थापक-वित्त (सह संचालक लेखा) | १ | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा |
| ३. | प्रकल्प व्यवस्थापक-संनियंत्रण (जल जीवन मिशन) | १ | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र विकास सेवा/ समकक्ष संवर्ग |
| ४. | प्रकल्प व्यवस्थापक-संनियंत्रण (स्वच्छ भारत मिशन) | १ | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र विकास सेवा/ समकक्ष संवर्ग |
| ५. | शाखा अभियंता | १ | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण/ जिल्हा परिषद, पाणी पुरवठा विभाग |
| ६. | लेखाधिकारी (JJM/ SBM) | १ | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा, वर्ग-२ |
| ७. | उप लेखापाल | ३ | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा |
| ८. | सहाय्यक | ४ | प्रतिनियुक्ती | समकक्ष वेतन श्रेणी मंत्रालयीन संवर्ग |
| | **एकुण** | **१३** | | |

**०२.** तसेच जिल्हा पाणी व स्वच्छता मिशनकरीता (मुंबई व मुंबई उपनगर वगळून उर्वरित ३४ जिल्ह्यासाठी प्रत्येकी ४ पदे) खालील १३६ पदे ०१.१०.२०२० पासून मिशन कालावधीपर्यंत नव्याने निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**जल जीवन मिशन अंतर्गत जिल्हा पाणी व स्वचछता मिशनकरीता नव्याने निर्माण करण्यात आलेली पदे**

| अ.क्र. | नव्याने निर्मित पदाचे नाव | पद संख्या | भरतीचा स्वरुप | भरतीचा संवर्ग |
|---|---|---|---|---|
| **१.** | **२.** | **३.** | **४.** | **५.** |
| १. | प्रकल्प संचालक | ३४ (प्रती जिल्हा १) | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र विकास सेवेतील उप मुख्य कार्यकारी अधिकारी |
| २. | प्रकल्प व्यवस्थापक (आर्थिक) | ३४ (प्रती जिल्हा १) | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील लेखाधिकारी |
| ३. | कनिष्ठ प्रशासकीय अधिकारी | ३४ (प्रती जिल्हा १) | प्रतिनियुक्ती | जिल्हा परिषद जिल्हा सेवा वर्ग-३ |
| ४. | लिपीक | ३४ (प्रती जिल्हा १) | प्रतिनियुक्ती | जिल्हा परिषदेतील लिपीक संवर्ग |
| | **एकुण** | **१३६** | | |

**०३.** जल जीवन मिशन अंतर्गत राज्य पाणी व स्वच्छता मिशन तसेच जिल्हा पाणी व स्वच्छता मिशनकरीता निर्माण करण्यात आलेली पदे संबंधित संवर्गातून प्रतिनियुक्तीने भरण्यात येतील. मिशन संचालक, जल जीवन मिशन (राज्य पाणी व स्वच्छता मिशन) यांनी राज्य पाणी व स्वच्छता मिशन व जिल्हा पाणी व स्वच्छता मिशनमधील नव्याने निर्माण करण्यात आलेली पदे प्रचलित नियमानुसार तातडीने भरण्याची कार्यवाही करावी.

**०४.** या पदांवरील वेतन व भत्त्यापोटी येणारा खर्च मागणी क्र. वाय-२, लेखाशीर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (२९) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम सहाय्यीकृत बाबी व पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षणासाठी अर्थसहाय्य (राज्य हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ९९७१) या लेखाशीर्षाखाली त्या त्या वित्तीय वर्षातील मंजुर तरतुदीतून भागविण्यात यावा.

**०५.** सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाचे अनौ. संदर्भ क्र. २१७८ व वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्र. २२४/व्यय-३, तसेच २०८/आपुक दिनांक २०.१०.२०२० व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. ३१२२, दिनांक २०.१०.२०२० अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२०११०४१४४०४७६५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2020.11.05 12:32:45 +05'30'

**( वसंत माने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, विधीमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधीमंडळ सचिवालय, मुंबई.
८. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (सामान्य प्रशासन/वित्त/ग्राम विकास/पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे वरिष्ठ स्वीय्य सहायक, मंत्रालय, मुंबई
१०. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, नरिमन पॉईंट, मुंबई.
११. मिशन संचालक, जल जीवन मिशन (राज्य पाणी व स्वच्छता मिशन), बेलापूर, नवी मुंबई
१२. जिल्हाधिकारी (सर्व),
१३. महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/२-नागपूर.
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१५. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई

१६. उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी(सर्व), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१८. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१९. निवडनस्ती-कार्यासन पापु-०७.